**सन २०१९-२० साठी राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) या योजनेंतर्गत उपलब्ध तरतूदीतून धनंजयराव गाडगीळ प्रबंध संस्थान, नागपूर या संस्थेस निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र: संकीर्ण-२०१९/प्र.क्र.११३/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ जानेवारी, २०२०.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय कृषी व सहकार विभाग क्र. सीटीआर-१४७२/१५०७८-सी-७, दि.६.०९.१९७२.
२) शासन निर्णय क्र: संकीर्ण २०१२/ प्र.क्र.१८/१२/पुनर्बांधणी -११/ २२-स, दि.६.११.२०१२.
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क. ९२/अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. सआ-६/ अंवनि/धंगाप्रसं/Format A./२०१९-२०/२०१९, दि. २५.११.२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी संघ ही संस्था राज्यामध्ये सहकारी शिक्षण, प्रशिक्षण, प्रचार व प्रसाराचे काम करणारी संघीय संस्था असून या संघाच्या अधिपत्याखाली धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर हे सहकारी प्रशिक्षण महाविद्यालय कार्यरत आहे. राष्ट्रीय सहकारी प्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या प्रशिक्षण विद्यालयाची स्थापना सन १९७२ साली केलेली आहे. केंद्र शासन व राज्य शासन यांनी ५०:५० या सम प्रमाणामध्ये वरील संस्थानचा खर्च वहन करण्याबाबतचे सूत्र विहित केले आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ च्या शासन परिपत्रकान्वये ६०% च्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे. त्यानुसार धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयाचा खर्च वहन करण्याकरिता केंद्र शासन व राज्य शासन यांनी वरीलप्रमाणे निश्चित केलेल्या विहित सूत्राप्रमाणे राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्श्यापोटी सन २०१९-२० करिता अर्थसंकल्पात मंजूर झालेल्या रु. ५०.०० लक्ष या तरतूदीमधून रु. ३०.०० लक्ष (६०%) इतका निधी सदर संस्थेस वितरित करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म.रा. पुणे या कार्यालयाने संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी संघाच्या अधिपत्याखालील धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या सहकारी प्रशिक्षण महाविद्यालयास राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्यापोटी देय असणारा रु. ३०.०० लक्ष (रुपये तीस लक्ष फक्त) इतका निधी वरील संस्थेस याद्वारे वितरित करण्यात येत आहे.

२. सध्याची शैक्षणिक क्षेत्रातील फी आकारणी पाहता संस्थानाने आपल्या उत्पन्नाचे स्त्रोत वाढविण्यासाठी आकारण्यात येणाऱ्या फी शुल्कामध्ये पर्याप्त स्वरुपात वाढ करण्याच्या अधीन राहून सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त निधीचा धनादेश कोषागार कार्यालयातून काढून प्रत्यक्ष संस्थानास देण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून पुढील अधिकाऱ्यांना याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे:-

आहरण व संवितरण अधिकारी-लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.नियंत्रक अधिकारी-अप्पर निबंधक (वसुली व नियोजन), सहकारी संस्था, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे. सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर केला आहे

त्याच कारणासाठी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी व सदर संस्थेस वितरित केलेला निधी रु. ३०.०० लक्ष खर्च केल्याबाबतचे संस्थेकडून उपयोगिता प्रमाणपत्र त्यांनी प्राप्त करुन ते शासनास सादर करावे.

४. उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च, मागणी क्र. व्ही-२ २४२५, सहकार (०२) (०२) राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर कार्यक्रम) याखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००१०९११४२४७५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f8faa195025519ecce143f48fe16b8572d279b7779146441b412b267fb25acd8, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2020.01.09 11:29:14 +05'30'

**( राजू. क. नरपांडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
३) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
४) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
५) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, पुणे,
१४) प्राचार्य, धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, आयसीएम बस स्टॉप, मिनी बायपास रोड, न्यू नंदनवन, नागपूर- ४४० ००९,
१५) कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) कार्यासन व्यय-२/अर्थसंकल्प-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती, कार्यासन-२२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.